जुलै-ऑक्टोबर २०१९ मधील अतिवृष्टी व पूर बाधित व्यक्तींना मदत देण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०१९/प्र.क्र.१७७/म-३
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीखः- २४ ऑक्टोबर, २०१९

संदर्भ: १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१९/ प्र.क्र.१६५/ म-३, दिनांक २९/०८/२०१९ व दिनांक ११/०९/२०१९
२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र. मशा/कार्या-६/ नै.आ./अ.वृ.पू. मदत/२०१९, दिनाक ०३/१०/२०१९
३) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र. मशा/ नै.आ./कार्या-६/सिंधुदुर्ग/अ.वृ.पू. बा./२०१९, दिनाक ३०/०९/२०१९
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/नैआ/पुनर्व/कली/कावि ३०२/२०१९, दिनांक ११/१०/२०१९.

प्रस्तावना :

राज्यातील विविध जिल्ह्यातील शहरी व ग्रामीण भागामध्ये दि. २६ जुलै व त्यानंतर झालेल्या अतिवृष्टीमुळे पुराचे पाणी शहरी व ग्रामीण भागामध्ये पसरले. या पूर परिस्थिमुळे बाधीत झालेल्या कुटुंबियांना मदत देण्याबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमितीने दिनांक १९/०८/२०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार मदतीचे दर व निकष शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१९/ प्र. क्र.१६५/म-३, दिनांक २९/०८/२०१९ आणि ११/०९/२०१९ अन्वये निश्चित करण्यात आले आहेत.

२. दिनांक २९/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अनु. २ , ३, व ८ मध्ये छोटे गॅरेज, छोटे उद्योग व्यावसायिक, दुकानदार, टपरीधारक, हस्तकला/हातमाग कारागिर/बारा बलुतेदार, हातगाडीधारक, घरांची पडझड, जनावरांच्या गोठ्यांचे नुकसान इत्याची बाबींकरीता आर्थिक मदत देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, कोकण यांनी रू १९,३७,३२,२२० (अक्षरी रूपये एकोणीस कोटी सदतीस लक्ष बत्तीस हजार दोनशे वीस फक्त) आणि विभागीय आयुक्त, अमरावती यांनी रूपये १३,८३,०००/- (अक्षरी रूपये तेरा लक्ष त्र्यांऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. अशाप्रकारे या दोन्ही विभागांसाठी एकूण रूपये १९,५१,१५,२२०/- (अक्षरी रूपये एकोणीस कोटी एकावण्ण लक्ष पंधरा हजार दोनशे वीस फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

दिनांक २६.७.२०१९ रोजी व त्यानंतर राज्यात विविध जिल्ह्यात निर्माण झालेल्या पुरपरिस्थितीमुळे छोटे गॅरेज, छोटे उद्योग व्यावसायिक, दुकानदार, टपरीधारक, हस्तकला/हातमाग कारागिर/बारा बलुतेदार, हातगाडीधारक तसेच घरांची पडझड, जनावरांच्या गोठ्यांची पडझड यामुळे झालेल्या नुकसानीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) व राज्य शासनाकडून वाढीव मदत अनुज्ञेय करून एकूण मदत देण्यास प्राप्त

झालेल्या शासन मान्यतेनुसार, विभागीय आयुक्त, कोकण आणि विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मागणी केलेला पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**कोकण विभाग** **(रक्कम रूपये)**

| अ. क्र. | जिल्हा | लेखाशीर्ष | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बारा बलुतेदार/छोटे उद्योग व्यवसायिक/दुकानदार/टपरी धारक यांना मदत | | एक रकमी घरभाडे | गोठ्यांच्या नुकसानीसाठी मदत | | एकूण |
| | | SDRF च्या निकषानुसार (२२४५ ०३३३) | राज्य शासनाच्या निधीतून (२२४५ २३८१) | राज्य शासनाच्या निधीतून (२२४५ २४०७) | SDRF च्या निकषानुसार (२२४५ ०२७१) | राज्य शासनाच्या निधीतून (२२४५ २३२७) | |
| १ | मुंबई | ० | ० | ० | ० | ० | **०** |
| २ | मुंबई उपनगर | ० | ० | ० | ० | ० | **०** |
| ३ | ठाणे | ० | ११२५५०००० | ० | १२६०० | ५४०० | **११२५६८०००** |
| ४ | पालघर | ० | ० | ० | १०५०० | ६३०० | **१६८००** |
| ५ | रायगड | २९८४८०० | २६०८६६३५ | ० | ४२०००० | २४०३०० | **२९७३१७३५** |
| ६ | रत्नागिरी | ६१५०० | ४५६७०८८५ | ७२००० | १७४३०० | १२६००० | ४६१०४६८५ |
| ७ | सिंधुदुर्ग | ० | ५०४७००० | ० | १८४८०० | ७९२०० | ५३११००० |
| **एकूण (अ) (कोकण विभाग)** | | **३०४६३००** | **१८९३५४५२०** | **७२०००** | **८०२२००** | **४५७२००** | **१९३७३२२२०** |
| **अमरावती विभाग** **(रक्कम रूपये)** | | | | | | | |
| १ | अमरावती | ० | १३५०००० | ० | २३१०० | ९९०० | १३८३००० |
| **एकूण (ब) (अमरावती विभाग** | | **०** | **१३५००००** | **०** | **२३१००** | **९९००** | **१३८३०००** |
| **एकूण (अ+ब)** | | **३०४६३००** | **१९०७०४५२०** | **७२०००** | **८२५३००** | **४६७१००** | **१९५११५२२०** |

२. उपरोक्त दराने देण्यात येणारी मदत ही केवळ याच घटनांसाठी मर्यादित राहील. ही बाब अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये. तसेच प्रस्तुत निधी वितरीत करतांना दि.२९/८/२०१९ व दि. ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात यावी.

३. वरील विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार निधी जिल्ह्यांना विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करुन देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी (म-११) यांनी सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

४. सदर निधी प्राप्त झाल्याबरोबर अतिवृष्टी व पूरपरिस्थिती बाधितांना तात्काळ वितरीत करण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार

अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. झालेल्या खर्चाची महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. वितरीत अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

५. विभागीय आयुक्त, कोकण आणि विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संबधितांना निधी वितरीत केल्यानंतर एकूण वितरीत निधीच्या ७५ टक्के रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच यापूढील निधी मागणीबाबत कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२४१४४३२८२२१९ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.10.24 14:48:12 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर)**

**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,

२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,

३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,

४. अपर मुख्य सचिव ( वित्त),मंत्रालय,मुंबई,

५. विभागीय आयुक्त, कोकण विभाग/अमरावती, विभाग

६. जिल्हाधिकारी, मुंबई / मुंबई उपनगर / ठाणे / पालघर / रायगड / रत्नागिरी / सिंधुदुर्ग / अमरावती.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

९. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/मुंबई उपनगर/ठाणे/पालघर/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/अमरावती.

११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई

१२. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई

१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई

१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )